


# जिराफ आणि पेली आणि मी - रोआल्ड दाल

## मराठी अनुवाद - सानिया

इथून जवळच रस्त्याच्या कडेला एक भकास जुनाट लाकडी घर आहे. मी जेव्हा जेव्हा त्या रस्त्याने जातो तेव्हा तेव्हा मला त्या घरात डोकावून पाहावंसं वाटतं. काय बरं असेल आत? मी एकदा खूप धीर गोळा करून आत डोकावलं तर मला काळाकुट्ट अंधार आणि धुळीशिवाय दुसरं काहीच दिसलं नाही. माझी आई म्हणते खूप पूर्वी या घराच्या तळमजल्यावर एक मिठाईचं दुकान होतं. घराच्या खिडकीवर पांढऱ्या चुन्याने वेड्यावाकड्या अक्षरात काहीतरी लिहिलंय, '***विकणे आहे'***.




एके दिवशी रस्त्याने जाताना सहज माझी नजर त्या घराकडे गेली. खिडकीवरचा पांढरा चुना पुसून ठसठशीत लाल रंगात कोणीतरी रंगवलं होतं, '***विकले गेले आहे'***. मी डोळे विस्फारून वेड्यासारखा त्या अक्षरांकडे बघत राहिलो. हे जुनाट घर कोणी का बरं विकत घेतलं असेल? हे घर समजा माझ्या मालकीचं असतं तर मी नक्कीच त्यात पुन्हा

मिठाईचं दुकान सुरु केलं असतं. त्यामध्ये मी खचाखच मिठाया भरल्या असत्या. काजूकतली, आंबा बर्फी, जिलब्या, रसगुल्ले, बासुंदी, सीताफळ रबडी, साखर लावलेले गुलाबजाम.....मिळण्याचे एकमेव ठिकाण...बिलीचे मिठाईचे दुकान! मी माझ्या स्वप्नाच्या दुनियेत रंगून गेलो होतो तेवढ्यात ***खडाङखाsss*** एक मोठ्ठा आवाज आला. दचकून मी जागच्या जागीच उडी मारली. एक भलं थोरलं कपाट घराच्या खिडकीतून उडत येत बरोबर रस्त्याच्या मध्ये आदळलं. त्याच्यामागोमाग चार खुर्च्या, एक पलंग, कमोड, खेळण्यातला लाकडी घोडा, रिकामा पिंजरा, शिलाई मशीन आणि असं बरच काही जुनाट सामान रस्त्यावरच्या कपाटाशेजारी येऊन विसावलं. घरात नक्कीच कोणीतरी पिसाळलेला राक्षस होता. कारण आता जिन्यांच्या लाकडी फळ्या, घराची कौलं आणि बाथरूमच्या फरश्यांचे तुकडेही खिडक्यांमधून सुसाट वेगाने बाहेर पडत होते.




मग विचित्र शांतता पसरली. मी खूप वेळ वाट बघितली. पण आता घरातून कसलाच आवाज येत नव्हता. न राहवून मी मोठ्या आवाजात ओरडलो, "***कोणी आहे का घरात?***" पण काहीच उत्तर आल नाही. हळूहळू अंधार पडायला लागला. नाईलाजाने मी घरी गेलो. पण घरी गेल्यावर सुद्धा रात्रभर माझ्या मनात त्या विचित्र घराचेच विचार येत होते.

सकाळी उठल्याउठल्या मी तडक त्या घराकडे निघालो. घराच्या जुन्या मातकट दाराच्या जागी आता कोरं करकरीत लालभडक दार बसवलेलं होतं. जुन्या दाराच्या दुप्पट उंचीचं असलेलं हे नवं दार फारच मजेशीर दिसतं होतं. त्याच्या उंचीवरून हे घर कुठल्यातरी तरी लंबू टांग्या उंचाड्या राक्षसाचं असणार याची मला खात्रीच पटली. दाराशेजारच्या खिडकीवरची लाल अक्षरं पुसून आता तिथे अजूनच काहीतरी खरडून ठेवलं होतं. डोळे बारीक करून मी ते वाचायचा प्रयत्न करू लागलो.

# लॅडरलेस विंडो क्लिनिंग कंपनी

***आमच्या येथे खिडक्या स्वच्छ करून मिळतील***

***तेही कचकट, गलिच्छ शिड्यांशिवाय !***

मी मान उंच करून घराकडे पाहू लागलो. भिंतीला कान लावून कानोसा घेऊ लागलो. तेवढ्यात, ***कर्ररss*** आवाज करीत सर्वात वरच्या मजल्यावरची एक खिडकी हलकेच उघडली. खिडकीतून दोन काळेभोर टपोरे डोळे माझ्याकडेच रोखून बघत होते.



अचानक दुसरी खिडकी उघडली आणि एक भला मोठ्ठा पांढरा पक्षी खिडकीच्या कठड्यावर येऊन बसला. त्याची केशरी रंगाची बेसिन सारखी भलीमोठी चोच बघून मी त्याला लगेच ओळखलं. तो एक पेलिकन होता. पेलिकनने माझ्याकडे बघितलं आणि तो भसाड्या आवाजात गायला लागला,



***'मला हवीये मच्छी***
***शिजवलेली किंवा कच्ची!***
***भुकेने मी झालो आहे वेडा!***
***चांगले पैसे देईन, नको मला फुकटची***
***इथून समुद्र किती लांब आहे रे पोरा?***

समुद्र इथून खूप दूर आहे', मी त्याला सांगितलं, 'पण गावात एक मच्छिमार राहतो'.

'मच्छीचं काय?'

'मच्छिमार राहतो म्हटलं **म च्छि मा र'**

'हे काय असतं?' पेलिकनने विचारलं. 'मला मच्छी फ्राय माहितीये, मच्छीचं कालवण माहितीये, मच्छीचं लोणचं करतात असंही मी ऐकलंय. पण हे मच्छिमार कधी नाही पाहिले बुवा आपण. कसे लागतात हे मच्छिमार?'

पेलिकनच्या या प्रश्नाने मी जरा गोंधळूनच गेलो. त्यामुळे घाईघाईने विषय बदलत म्हणालो, 'त्या शेजारच्या खिडकीत कोण आहे?'



'ती जिराफी आहे.' पेलिकनने सांगितलं. 'तुला एक गंमत सांगू? ती सर्वात वरच्या मजल्यावरच्या खिडकीतून डोकावत असली तरी तिचे पाय मात्र तळमजल्यावर आहेत. कसलं भारी ना!'

आम्ही बोलत असतानाच पहिल्या मजल्यावरची खिडकी उघडली आणि टुणकन उडी मारून माकडू कठड्यावर बसला. कठड्यावर वर खाली उड्या मारत त्याने नाच केला. काडीपैलवान माकडू इतका हडकुळा होता की तो वायरपासून बनल्यासारखा वाटत होता. त्याचा नाच मला खूपच आवडला. वर खाली उड्या मारत मी त्याच्यासाठी जोरजोरात टाळ्या वाजवल्या.



'आम्ही खिडक्या साफ करणारे आहोत', माकडू गाऊ लागला.

*गट आमचा भारी*

*आमची पद्धतच न्यारी*

*काम करतो भरपूर पण वेळ घेतो कमी!*

*घेतो मेहनत पुष्कळ,*

*करतो खिडक्या स्वच्छ आणि नितळ*
*जिराफ आणि पेली आणि मी!*

*घेत नाही उसंत,*

*जोपर्यंत काम होत नाही पसंत*

*प्रत्येक खिडकी चकाचक ही देतो हमी!*

*काम आमचं टकाटक,*

*खिडक्या होतात चकाचक!*
*जिराफ आणि पेली आणि मी!*

*कशाला घ्यायचा ताण?*

*जेव्हा ३० फूट उंच आहे मान!*

*त्यामुळे शिड्या कधीच वापरत नाही आम्ही*

*वापरतो साबण आणि पाणी,*

*थोडी गंमत आणि गाणी!*

*जिराफ आणि पेली आणि मी!*

माकडूच्या गाण्याने मी भारावून गेलो. त्यांच्याशी किती बोलू अन् किती नको असं मला झालं. जिराफीलाही कदाचित तेच वाटत असावं कारण ती पेलिकनला म्हणाली, ‘पेली, आपल्या छोट्या दोस्ताला वर घेऊन येतोस का? म्हणजे मला त्याच्याशी छान गप्पा मारता येतील.’ लगेचच पेली उडत उडत माझ्यापाशी आला. आपली भली मोठ्ठी चोच उघडून म्हणाला, ’चल बस पट्कन!’ मी डोळे विस्फारून त्याच्या उघड्या चोचीकडे बघत राहीलो. त्या अंधाऱ्या कोठडीत बसण्याच्या कल्पनेनेच माझ्या अंगावर काटा आला.



‘अरे बस रे!’, वरच्या खिडकीतून माकडू ओरडला. ‘तो काही तुला खाणार नाहीये!’

मी पेलिला म्हणालो, ‘बर बरं बसतो मी. पण एका अटीवर. मी आत बसल्यावर तू चोच अजिबात बंद करायची नाहीस.’

‘तू अजिबात काळजी करू नकोस’, पेली मला धीर देत म्हणाला.

***कर मनाची तयारी***
***कारण माझी चोच आहे भारी!***
***कशाला घाबरतोस तू यार***
***माझ्या चोचीत आहे जादू, गंमतच न्यारी!***
***जास्त करू नको विचार, हो स्वार!***

‘नाही नाही. पहिले मला वचन दे की तू अजिबात चोच बंद करणार नाहीस.’

‘अरे माझ्या चोचीत जादू आहे’, पेली म्हणाला. ‘तुला समजत कसं नाहीये. तू एकदा आत बसलास ना की मी चोच बंदच करू शकणार नाही.’

‘दाखव बरं तुझी जादू.’,मी म्हणालो.

‘बघ तर मग’ पेली म्हणाला आणि बटण दाबल्यासारखा त्याच्या चोचीचा वरचा भाग गुंडाळी होत आत सरकू लागला. सरकत सरकत तो हळूहळू दिसेनासा झाला.



माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

‘काय कशी वाटली जादू?’ पेलीने विचारलं.

‘सॉलिड आहे यार!’

‘हो ना! चोचीच्या वरच्या भागाचा उपयोग मला फक्त मासे चावण्यासाठी होतो. खरी गंमत तर खालच्या भागातच आहे. वरचा भाग सरकवून आत ढकलला की झाली बादली तयार! खिडक्या पुसण्यासाठीचं पाणी न्यायला मी या चोचीच्या बादलीचाच वापर करतो. मी दिवसभर असा चोचीचा वरचा भाग आत सरकवून राहू शकतो.

***कामाच्या वेळी ढकलतो चोचीला आत***

***तरीसुद्धा करतो बडबड अफाट!***

***बादलीत भरतो पाणी, घेतो भरारी***

***माझ्या चोचीत आहे जादू, गंमतच न्यारी!***

‘पुरे झाली आता तुझी बडबड!’, वरून माकडू ओरडला. ‘चल, लवकर आपल्या छोट्या दोस्ताला वर घेऊन ये. जिराफी केव्हापासून वाट बघतीये.’

मी पट्कन पेलीच्या चोचीत उडी मारली. पेलीने पंख पसरले आणि एका झेपेत आम्ही सर्वात वरच्या मजल्यावरच्या खिडकीपाशी पोचलोसुद्धा!



जिराफिने तिच्या काळ्याभोर टपोऱ्या डोळ्यांनी माझ्याकडे पाहिलं. किंचित हसून ती म्हणाली, 'काय म्हणतोस दोस्ता, कसा आहेस? तुझं नाव काय आहे?'

'बिली', मी सांगितलं.

'किती गोड नाव आहे रे', ती हळुवारपणे म्हणाली. 'ऐक ना बिली, आम्हाला तुझ्या मदतीची खूप गरज आहे. आमच्या जवळचे सगळे पैसे हे घर विकत घेण्यातच संपले. आता आम्हाला लवकरात लवकर नवीन कामं शोधायला हवीत. त्याशिवाय पैसे कसे मिळणार? आम्ही तिघही भुकेने हैराण झालोय. पेलिला मासे हवेत, माकडूला अक्रोड आणि मी तर चमचमत्या झाडाच्या गुलाबी-जांभळ्या फुलांशिवाय दुसरं काहीच खात नाही. ही फुलं खूप दुर्मिळ आणि महाग आहेत.

'आई गं! मला अति भूक लागलीये' पेली कळवळून म्हणाला. 'बोंबील, मांदेली, पापलेट, सुरमई... नुसता विचार करूनच तोंडाला पाणी सुटतंय.'

'सुरमईसाठी तर पेली वेडा आहे!', माकडू म्हणाला.

'अहाहा...सुरमई! दिवस रात्र मला फक्त सुरमईचीच स्वप्न पडतात.'

'आणि मला अक्रोडांची!' माकडू म्हणाला. 'कुरकुरीत-चुरचुरीत अक्रोडांचा पाऊस पडतोय....अक्रोडांच्या ढिगाऱ्यात मी लोळतोय...'

आमच्या गप्पा अगदी रंगात आल्या होत्या. तेवढ्यात एक पांढरीशुभ्र मर्सिडीज कार करकचून ब्रेक दाबत घराजवळ येऊन थांबली. गाडीमधून निळ्या सोनेरी गणवेषातला ड्रायव्हर उतरला. त्याच्या हातात एक पत्र होतं.



'अरे बापरे, ही तर हॅम्पशायरच्या सरदाराची गाडी आहे.' मी जिराफिच्या कानात कुजबुजलो.

'कोण आहे हा सरदार?' जिराफिने विचारलं.

'अगं तो इंग्लंडमधला सर्वात श्रीमंत माणूस आहे.' मी सांगितलं.

ड्रायव्हरने घराच्या दारावर टकटक केलं. पण दार उघडायला जाणार कोण? आम्ही सगळे तर खिडक्यांमध्येच बसलेलो होतो. त्याने सहज मान वर करून पाहिलं तेव्हा आम्ही त्याच्या नजरेस पडलो. तिसऱ्या मजल्यावरच्या खिडकीतून डोकावणारी जिराफी, कठड्यांना लोंबकळणारा माकडू आणि पेलीच्या चोचीत बसलेला मी असं फारच गमतीदार दृश्य होत ते. पण ते पाहून ड्रायव्हरला मुळीच आश्चर्य वाटलं नाही. देशातल्या सर्वात श्रीमंत माणसाच्या ड्रायव्हरला अशा छोट्या छोट्या गोष्टींमध्ये कसली गंमत वाटतीये.



ड्रायव्हर म्हणाला, 'हॅम्पशायरच्या सरदारांनी हे पत्र मला **लॅडरलेस विंडो क्लिनिंग कंपनी** कडे सुपूर्त करायला सांगितलं आहे.

‘हो हो, आम्हीच आहोत ते.’ माकडू म्हणाला.

‘तुम्ही प्लीज ते पत्र आम्हाला वाचून दाखवाल का?’ जिराफिने विचारलं.

ड्रायव्हरने घसा खाकरला आणि पत्र वाचायला सुरुवात केली.



***स.न.वि.वि.***

***आज सकाळी गाडीतून फेरफटका मारताना तुमची नोटीस माझ्या नजरेस पडली. मी खूप वर्षांपासून एका कुशल आणि अनुभवी खिडक्या स्वच्छ करणाऱ्या कंपनीच्या शोधात होतो. माझ्या हवेलीला एकूण सहाशे सत्त्याहत्तर (कदाचित जास्तच) खिडक्या आहेत. कृपया लवकरात लवकर मला भेटावयास यावे ही विनंती.***

***आपला विश्वासू,***

***हॅम्पशायरचा सरदार***

‘हे पत्र सरदारांनी स्वतः आपल्या हस्ताक्षरात लिहिले आहे.’ पत्राची घडी करत ड्रायव्हर म्हणाला.

‘कृपया सरदारांपर्यंत आमचा निरोप पोहचवा की आम्ही लवकरात लवकर हवेलीवर येत आहोत.’ जिराफी ड्रायव्हरला म्हणाली.

टोपीला हात लावत ड्रायव्हरने आम्हाला सलाम केला आणि मग तो गाडीत बसून निघून गेला.

‘येssssस्स! काम मिळालं.’ टणाटण उड्या मारत माकडू ओरडला.

‘सहाशे सत्त्याहत्तर खिडक्या!’ पेली डोळे मोठे करत म्हणाला. ‘या कामाला सॉलिड मजा येणारे!’

‘बिली, तुला हॅम्पशायरची हवेली कुठे आहे माहीत आहे का?’ जिराफिने मला विचारलं.

‘हो. तो समोरच्या टेकडीवर एक वाडा दिसतो आहे ना, तीच ती हॅम्पशायरची हवेली. चला मी तुम्हाला रस्ता दाखवतो.’

‘चला तर मग!’ माकडू ओरडला.

जिराफिने मान खाली वाकवली आणि ती दरवाज्यातून बाहेर पडली. माकडूने तिच्या पाठीवर उडी मारली. तो तिच्या मानेला लोंबकाळू लागला. पेली माझ्यासकट उडाला आणि जिराफीच्या डोक्यावर जाऊन बसला. आणि मग निघाली आमची स्वारी!



थोड्याच वेळात आम्ही टेकडीवर पोचलो. हवेली जवळ येऊ लागली तशी आमच्या सगळ्यांच्याच मनात थोडी धाकधूक होऊ लागली.

‘कसा आहे रे या सरदाराचा स्वभाव?’ जिराफिने मला विचारलं.

‘स्वभावाबद्दल माहीत नाही. पण तो प्रचंड श्रीमंत आहे.’ मी सांगितलं. ‘फक्त गुलाबाच्या बागेची काळजी घ्यायलाच त्याने पंचवीस माळी ठेवलेत म्हणे.’

‘बघा बघा, पोचलो आपण हवेलीजवळ.’ माकडू ओरडला.



ती अलिशान हवेली पाहून आम्ही भारावून गेलो. हवेली कसली राजवाडाच होता तो. नाही नाही राजवाड्यापेक्षाही मोठी होती ती हवेली!

'खिडक्यांकडे तर बघा.' माकडू म्हणाला. 'आपण आयुष्यभर पुसत राहीलो तरी त्या संपणार नाहीत.'

तेवढ्यात आमच्या कानावर एका माणसाचा आरडाओरडा आला. 'मला ती काळीभोर जांभळं हवी आहेत. अरे ती नाही! त्याच्या वरची. झाडाच्या सर्वात वरच्या फांदीला आहेत ना ती.'

आम्ही झुडूपाआडून डोकावून पहिलं तर एक भरघोस पांढऱ्या मिश्या असलेला म्हातारा जांभळाच्या झाडाखाली उभा असलेला आम्हाला दिसला. झाडाला शिडी टेकवली होती आणि माळी शिडीवर चढून जांभळं खुडत होता.



'मला आत्ताच्या आत्ता ती सर्वात वरच्या फांदीवरची जांभळं दे.' जोरजोरात हातवारे करत म्हातारा ओरडला.

‘माफ करा सरदार.’ माळी म्हणाला. ‘ह्या शिडीची उंची खूपच कमी आहे. वरच्या फांदीपर्यंत पोहोचणं केवळ अशक्य आहे.’

‘ते काही मला सांगू नकोस.’ सरदाराचा आवाज आता फारच चढला होता. ‘मला ती जांभळं पाहिजेत म्हणजे पाहिजेत!.’

‘चल आपली कमाल दाखवूयात.’ पेली माझ्या कानात कुजबुजला आणि एका झेपेत आम्ही जांभळाच्या झाडापाशी पोचलोसुद्धा. सर्वात वरच्या फांदीवर बसत तो म्हणाला, ‘चल बिली, पटापट जांभळं तोड आणि माझ्या चोचीत टाक.’

आम्हाला बघून माळी इतका दचकला की तो शिडीसकट खाली पडला. खालून सरदार बेंबीच्या देठापासून किंचाळत होता. रागाने तो लालेलाल झाला होता. ‘कोणी तरी पट्कन माझी बंदूक आणा! केशरी चोचीच्या पांढऱ्या राक्षसा, खबरदार माझ्या जांभळांना हात लावलास तर! ती जांभळं माझी आहेत. एक पाउल पुढे टाकलस तर याद राख! तिथेच आडवा पाडतो तुला! माझी बंदूक कुठे आहे?’



‘लवकर लवकर! आपल्याकडे वेळ नाहीये.’ पेली कुजबुजला.

‘अरे मूर्खा, माझ्या तोंडाकडे काय बघत बसला आहेस! जा पट्कन आतून माझी बंदूक घेऊन ये.’ सरदार माळ्यावर खेकसला. ‘एकाच गोळीत ठार करतो या राक्षसाला. माझी जांभळं चोरतो काय! आज तुला नाश्त्यात नाही ना खाल्ला तर नावाचा सरदार नाही.’

‘झाली जांभळं खुडून.’ मी पेलीच्या कानात कुजबुजलो.

लगेच पेलीने झेप घेतली आणि आम्ही रागाने लालेलाल झालेल्या सरदाराच्या पायाशी जाऊन बसलो.

मी माझी मान वाकवली आणि जांभळांचा गुच्छ पुढे करत म्हणालो, 'आपली जांभळं, सरदार"



सरदार भलताच आश्चर्यचकित झाला. त्याने तोंडाचा आ वासला होता. आणि त्याचे डोळे तर इतके मोठ्ठे झाले होते की ते आता खोबणीतून निसटून खाली पडतात की काय अशी भीती मला वाटू लागली. 'अरे देवा! काय चाललं आहे हे?' तो पुटपुटला. 'कोण आहात तुम्ही?'

तेवढ्यात झुडूपामागून जिराफी बाहेर आली. माकडू तिच्या मानेला लोंबकळत नाचत होता. त्यांच्याकडे बघून सरदार अजूनच गोंधळला. कसबसं स्वतःला सावरत तो म्हणाला, 'कोण आहात तुम्ही? आणि इथे काय करताय?'

'आम्ही खिडक्या साफ करणारे आहोत', माकडू गाऊ लागला.

***घेतो मेहनत पुष्कळ,***
***करतो खिडक्या स्वच्छ आणि नितळ***
***प्रत्येक खिडकी चकाचक ही देतो हमी!***
***घेत नाही उसंत,***
***जोपर्यंत काम होत नाही पसंत***
***जिराफ आणि पेली आणि मी!***

'आपल्याच निरोपानुसार आम्ही इथे आलो आहोत.' जिराफी म्हणाली.

आता कुठे सरदाराच्या डोक्यात प्रकाश पडला. त्याने एक टपोरं जांभूळ तोंडात टाकलं आणि सावकाश चावून खाल्लं. जांभळातली बी जमिनीवर थुंकत तो म्हणाला, 'तुम्ही मला हवी असलेली जांभळं आणून दिलीत त्याबद्दल मी तुमचा आभारी आहे. तुम्ही मला थंडीमध्ये सफरचंद उतरवायला देखील मदत करू शकता का?'

'हो हो नक्कीच!' आम्ही सगळे एका सुरात ओरडलो.

'आणि तू कोण आहेस?' सरदाराने माझ्याकडे बघत विचारलं.

'तो आमच्या कंपनीचा मॅनेजर आहे, बिली.' जिराफी म्हणाली. 'त्याच्याशिवाय आम्ही कुठेच जात नाही.'

'बरं बरं. चला तर मग आता आपण कामाचं बोलूया.' सरदार म्हणाला.

मी पेलीच्या चोचीतून बाहेर उडी मारली आणि आम्ही सगळे सरदारच्या मागोमाग चालू लागलो. हवेलीपाशी पोचल्यावर किंचित थांबून सरदारने विचारलं, 'शिडीशिवाय कसं काय काम करणार तुम्ही?'

'सरदार, अगदी सोप्पयं.' जिराफी म्हणाली. 'मी आहे शिडी, पेली आहे बादली आणि माकडू आमचा गडी. बघा तर मग.'

आणि मग झाली कामाला सुरुवात. माकडू टुणकन उडी मारून जिराफीच्या पाठीवरून खाली उतरला. बागेतला नळ चालू करून त्याने पेलीच्या चोचीची बादली भरली. परत उडी मारून तो जिराफीच्या पाठीवर बसला. नारळाच्या झाडावर चढावं तसा तो तिच्या उंचच उंच मानेवर चढू लागला आणि तोल सांभाळत तिच्या डोक्यावर उभा राहिला.



'आपण सर्वात वरच्या मजल्यापासून सुरुवात करूया. पेली पट्कन पाणी घेऊन ये.' जिराफी म्हणाली.

'वरच्या दोन मजल्यांचा तुम्ही विचारच करू नका.' किंचित हसत सरदार म्हणाला. 'तिथे पोहोचणं केवळ अशक्य आहे.'

‘कोण म्हणतं असं?’

‘मी म्हणतो मी.’ सरदार ठामपणे म्हणाला. ‘कोणाचाही जीव धोक्यात घालायची मला अजिबात इच्छा नाही आहे.’

‘का? माझी मान तिथपर्यंत पोहोचण्यात काय अडचण आहे?’ जिराफी म्हणाली. तिचा आवाज सुद्धा आता हळूहळू चढू लागला होता.

‘जास्त आगाऊपणा करू नकोस!’ सरदार खेकसला. ‘एकदा सांगितलं ना तू तिथे पोहोचू शकत नाहीस म्हणून. बडबड करण्यात वेळ वाया घालवू नका. कामाला लागा!’

‘सरदार,’ जिराफी आवाज हळू ठेवण्याचा प्रयत्न करत म्हणाली. ‘अख्ख्या जगात अशी एकही खिडकी नाही जिथे माझी मान पोहोचू शकणार नाही.’

‘जिराफी दाखव तुझ्या मानेची कमाल!’ माकडू वर खाली उड्या मारत ओरडला.

आणि मग खरच जादू झाली. जिराफीची आधीच भरपूर उंच असलेली मान अजून उंच होऊ लागली.

उंच...उंच...होत वर...वर... जाऊ लागली.



सर्वात वरच्या मजल्यावरच्या खिडक्यांपर्यंत पोहोचल्यावरच मान वाढायची थांबली.

जिराफीने खाली पाहिलं आणि म्हणाली, ‘काय, कशी वाटली जादू?’

सरदाराच्या तोंडातून शब्दच फुटत नव्हते. मी सुद्धा थक्क झालो होतो. अशी जादू मी जन्मात कधी पाहिली नव्हती. जिराफीची मान तर पेलीच्या चोचीपेक्षाही भन्नाट होती!

स्वतःशीच हसत जिराफी हळू आवाजात गाऊ लागली.

***जादुई माझी मान***
***होते उंचच उंच छान***
***जर घेतलं मी मनावर***
***तर जाईल ती ढगावर!***
***बघताना हरपून जाईल भान!***



चोचीच्या बादलीमध्ये पाणी भरलेला पेली उडत उडत सर्वात वरच्या मजल्यावरच्या एका खिडकीपाशी जाऊन बसला. आणि मग खरोखरच कामाला सुरुवात झाली. त्यांचा कामाचा वेग भारीच होता. एक खिडकी स्वच्छ करून झाली की लगेच पेली त्याची बादली घेऊन दुसऱ्या खिडकीपाशी जायचा. जिराफीसुद्धा तिच्या मानेची शिडी हलवायची. माकडू कापडाचा बोळा पाण्यात बुडवून नीट पिळून घ्यायचा. आणि मग लगेच दुसरी खिडकी साफ करायला सुरुवात.

अशा प्रकारे चौथ्या मजल्यावरच्या सगळ्या खिडक्या पुसून झाल्यावर जिराफीच्या जादुई मानेची उंची आपोआप कमी होऊ लागली. तिसऱ्या मजल्यावरच्या खिडक्यांपर्यंत पोचल्यावर ती कमी व्हायची थांबली. माकडूने लगेच उडी मारून कामाला सुरुवात केली.



‘अप्रतिम!’ आनंदाने सरदार ओरडला. ‘लाजवाब! कमाल! अफलातून! हवेलीच्या खिडक्यांवर इतकी धूळ साचली होती की गेल्या चाळीस वर्षांपासून मी खिडक्यांमधून बाहेरचं दृश्य पाहू शकलो नाही आहे. आता मी कॉफीचा मग घेऊन आरामात तासन तास खिडकी बाहेर बघत बसणार आहे.’

अचानक जिराफी, पेली आणि माकडू एकदम स्तब्ध झाले. त्यांना असं जागच्याजागी गोठलेलं पाहून सरदाराने मला विचारलं, ‘काय झालं?’

‘माहित नाही.’ मी म्हणालो.

तेवढ्यात माकडूला डोक्यावर घेऊन जिराफी मांजर पावलांनी आमच्याजवळ आली. पेली सुद्धा अजिबात आवाज न करता हलकेच खाली उतरला. सरदाराच्या कानामध्ये जिराफी कुजबुजली, ‘सरदार, तिसऱ्या मजल्यावरच्या एका खोलीमध्ये एक माणूस आहे. तो भसाभस सगळी कपाटं उघडतोय आणि आतल्या वस्तू उचकटतोय. त्याच्याकडे पिस्तूलसुद्धा आहे.’

‘कु...कुठली खोली?’ सरदाराने चाचरत विचारलं.

'तिसऱ्या मजल्यावरची एक खिडकी सताड उघडी दिसते आहे ना ती खोली.' जिराफीने सांगितलं.

'अरे बापरे!' सरदार ओरडला. 'ती तर आमच्या बाईसाहेबांची खोली आहे. चोराचा नक्कीच बाईसाहेबांच्या दागिन्यांवर डोळा आहे. कोणीतरी पोलिसांना बोलवा. पकडा त्या चोरट्याला!'

सरदाराचं बोलणं संपायच्या आतच पेलीने हवेत झेप घेतली. हवेतच कोलांटी उडी मारत त्याने चोचीतलं पाणी फेकून दिलं. त्याच्या चोचीचा वरचा भाग गुंडाळी होत बाहेर सरकला आणि पेली चोर पकडायला सज्ज झाला.



'या पक्ष्याला वेड लागलंय की काय?' सरदार ओरडला.

'सरदार, धीर धरा आणि गंमत बघा!' माकडू म्हणाला.



बाणासारखा सुसाट पेली खिडकीतून खोलीत शिरला. क्षणभरात तो बाहेर आला तेव्हा त्याने चोच घट्ट मिटली होती. उडत उडत तो सरदारापाशी आला. पेलीच्या चोचीतून भयानक ***धाडssधाड*** आवाज येत होता. चोर आतून जोरजोरात लाथा झाडत होता.

'पेलीने करून दाखवलं!' माकडू ओरडला. ' त्याने चोराला चोचीत पकडलंय.'

'शाब्बास पेली!' सरदार पेलीची पाठ थोपटत म्हणाला. ताबडतोब त्याने त्याच्या काठीतून तलवार उपसली. मोठ्या आवाजात तो गरजला. 'पेली चोच उघड! बघतोच आता मी त्या चोराला. त्याला काही कळायच्या आतच त्याची चटणी करून टाकतो!

पण पेलीने चोच उघडली नाही. चोच घट्ट बंद ठेवत त्याने मानेनेच 'नाही' म्हटलं.

'सरदार, चोराकडे पिस्तूल आहे,' जिराफी म्हणाली. 'पेलीने चोच उघडली तर चोर आपल्या सगळ्यांना मारून टाकेल.'

'त्याच्याकडे पिस्तूल असू दे नाही तर रणगाडा! ते मी बघून घेईन!' सरदार किंचाळला. रागाने त्याच्या पांढऱ्या मिश्या थरथरु लागल्या. 'पेली, चोच ***उघड***!'

तेवढ्यात एक मोठ्ठा आवाज झाला. ***बँऽऽग!!***

'बापरे!' सरदार ओरडला. 'चोर आतून गोळ्या झाडतोय. तो आपल्या सगळ्यांना मारून टाकेल. पेली चोच अजिबात उघडू नकोस!'

'पेली, चोच जोरजोरात हलव. घुसळून टाक त्या चोरट्याला!' जिराफी ओरडली.



पेली जोरजोरात मान हलवू लागला. चोच गोलगोल फिरवू लागला. हलवून हलवून त्याने चोराची हाडं पार खिळखिळी करून टाकली.

'शाब्बास पेली! हलवत रहा चोच.' जिराफी ओरडली. 'बघू आता, तो चोर बंदूक हातात घ्यायची कशी हिम्मत करतो ते.'

तेवढ्यात एक जाडजूड बाई हवेलीतून बाहेर धावत आली आणि मोठ्या आवाजात ओरडू लागली. 'माझे दागिने! माझे सगळे दागिने चोरीला गेले. माझे हिऱ्याचे कानातले! सोन्याचे हार! मोत्याच्या बांगड्या! पाचूच्या अंगठ्या! सगळं सगळं गेलं! चोरट्यांनी माझी अख्खी खोली साफ केली!'

आणि मग एके काळची प्रसिद्ध गायिका असलेली ही बाई तारस्वरात गाऊ लागली.

*खजिना माझा लुटला*
*कुणी फसविले हो मजला?*
*हिरे, मोती, सोने, पाचू पळविले झणी*
*दागिने द्या मज परत आणुनी!*

*कशी वेळ ती साधली*
*खोली पिंजून काढली*
*तुटते हे मन क्षणोक्षणी!*
*दागिने द्या मज परत आणुनी!*



बाईसाहेबांचा शोक ऐकून माझ्या काळजाचं पाणी पाणी झालं. आम्ही सगळे तिच्या सुरात सूर मिसळून गाऊ लागलो. (अर्थात, पेली सोडून. त्याने चोचीमध्ये चोराला पकडून ठेवलं होतं ना!)

*दागिने द्या परत आणुनी...*
*दागिने द्या परत आणुनी!*

‘शांत हो एलिझाबेथ’ सरदार म्हणाला. आणि मग तो पेलीकडे हात दाखवत म्हणाला, ‘या चलाख पक्ष्यामुळे चोर पकडला गेला आहे. त्या बदमाष चोरट्याला पेलीने चोचीत पकडून ठेवलंय.’

बाईसाहेब डोळे विस्फारून पेलीकडे बघू लागल्या. त्यांच्या चेहऱ्यावर अविश्वास स्पष्ट दिसत होता. ‘जर चोर खरंच या पक्ष्याच्या चोचीत आहे तर मग तुम्ही त्याला मारून का टाकत नाही? तुमच्या धारदार तलवारीपुढे चोराचा काय निभाव लागणार आहे? चल रे पेली उघड चोच! मला माझे दागिने परत हवे आहेत.’ बाईसाहेब ओरडल्या.

‘अजिबात नाही!’ सरदार ओरडला. एलिझाबेथ, तुला समजत कसं नाहीये! चोराकडे पिस्तूल आहे. तो आपल्या सगळ्यांना मारून टाकेल.’

तेवढ्यात पोलिसांच्या चार गाड्या भोंगे वाजवत आल्या. त्यांनी आम्हाला चारही बाजूंनी घेरलं

‘तुम्ही ज्या चोराच्या मागावर आहात तो आमच्या ताब्यात आहे.’ सरदार म्हणाला. ‘चल पेली उघड चोच!’



पेलीने त्याची भलीमोट्ठी चोच उघडली आणि पोलिसांनी लगेच झडप घालून चोराला ताब्यात घेतलं. एका पोलिसाने चोराकडून बंदूक हिसकावून घेतली. दुसऱ्याने त्याच्या हातात बेड्या घातल्या.

‘बापरे!’ इन्स्पेक्टर म्हणाला. ‘हा तर खुद्द कोब्रा गँगचा बॉस, नागराज आहे.’

‘काय? कोण आहे हा नागराज?’ आम्ही सगळ्यांनी एका सुरात विचारलं.

‘नागराज जगातला सर्वात खतरनाक चोर आहे.’ इन्स्पेक्टरने सांगितलं. ‘तो नक्कीच भिंतींवरून सरपटत घरात शिरला असेल. नागराज कशावरही चढू शकतो.’

‘माझे दागिने! माझे दागिने कुठे आहेत?’ बाईसाहेब ओरडल्या.



‘हे बघा’ इन्स्पेक्टर म्हणाला. त्याने चोराच्या खिशात हात घालून सात-आठ पाचूच्या अंगठ्या बाहेर काढल्या. चोराने शर्टच्या खिशात, कॉलरमध्ये, टोपीमध्ये जिथे दिसेल तिथे दागिने कोंबले होते.

आता कुठे जरा बाईसाहेबांच्या जीवात जीव आला. पोलिसांनी सगळे दागिने बाईसाहेबांच्या हवाली केले आणि त्या खतरनाक चोराला घेऊन ते निघून गेले. सगळीकडे सामसूम झाली.

‘ते बघा’ माकडू म्हणाला. ‘चोरट्याच्या गोळीने पेलीच्या चोचीला केवढं मोठं भोक पडलं आहे.’



‘अरेरे...’ जिराफी हळहळली.

'आता माझ्या या चोचीचा काहीच उपयोग नाही. चोचीची बादली पाणी धरूनच ठेवू शकणार नाही.' पेली हताशपणे म्हणाला.

'तू अजिबात काळजी करू नकोस दोस्ता.' सरदार पेलीची चोच हलकेच थोपटत म्हणाला. 'माझ्या मर्सिडीजचा ड्रायव्हर पंक्चर काढण्यात एकदम पटाईत आहे. तो तुझ्या चोचीला पडलेलं भोक लगेच बुजवून देईल.'

हे ऐकून पेली खुदकन हसला.

'तुम्हा सगळ्यांचे आभार कसे मानु मला समजत नाहीये.' सरदार म्हणाला. 'ते दागिने कोट्यावधी रुपयांचे होते. आज फक्त तुमच्यामुळेच ते वाचू शकले. मी तुम्हाला कितीही मोठं बक्षीस दिलं तरी कमीच आहे. म्हणूनच मी आता तुमच्यापुढे एक प्रस्ताव ठेवतो. बघा तुम्हाला कसा वाटतो ते. जिराफी, पेली आणि माकडू, तुम्ही आजपासून कायमचेच माझ्या हवेलीवर राहायला या. मी तुमच्या राहण्याची उत्तम व्यवस्था करतो. मऊमऊ बिछाने, उबदार गोधड्या, थंडगार शॉवर, चमचमीत पंचपक्वान्न काय हवं ते मागा. सगळं आहे इथे. मस्त चैनीत आयुष्य घालवता येईल तुम्हाला. बदल्यात तुम्ही माझ्या खिडक्या स्वच्छ ठेवाल. जांभळं, आंबे आणि सफरचंद उतरवायला मदत कराल. पेलीला चालणार असेल तर मला अधून मधून त्याच्या चोचीतून छानशी चक्कर मारायलाही आवडेल.'



'हो हो का नाही!' पेली म्हणाला. 'तुम्ही म्हणत असाल तर लगेच मारुयात एक चक्कर.'

‘आता नको. पहिले एक फक्कड चहा पिऊयात आणि मग जाऊयात चक्कर मारायला.’ सरदारने सांगितलं.

सरदार बोलत असताना जिराफी थोडी अस्वस्थ वाटत होती. तिची चुळबुळ बघून सरदाराने विचारलं, ‘काय झालं? काही अडचण असेल तर खुश्शाल सांग मला.’

‘अडचण नाही ..पण...अं..अं..’

‘लाजतेस कशाला? सांग की.’ सरदार म्हणाला.

‘मला खूप भूक लागलीये हो. आम्ही सगळ्यांनीच खूप दिवसांपासून काही खाल्लं नाहीये.’ जिराफी कसबसं अडखळत म्हणाली.

‘हात्तिच्या! एवढंच ना!’ बोल तू काय खाणार?’ सरदाराने विचारलं.

‘माझं खाद्य खूप दुर्मिळ आहे. आणि ते सोडून मी दुसरं काहीच खात नाही.’ जिराफी म्हणाली.

‘आता आलं माझ्या लक्षात.’ सरदार म्हणाला. ‘तू काही साधासुधा जिराफ नाहीयेस. फक्त आफ्रिकेत सापडणाऱ्या दुर्मिळ प्रजातीपैकी एक आहेस तू. आणि तू काय खातेस हेदेखील मला अगदी पक्क ठाऊक आहे. प्राण्यांबद्दल चांगला अभ्यास आहे माझा. माझ्या मते तू चमचमत्या झाडाच्या गुलाबी-जांभळ्या फुलांशिवाय दुसरं काहीच खात नाहीस. बरोबर ना?’

‘तिच तर अडचण आहे ना सरदार.’ जिराफी उसासा टाकत म्हणाली.

‘त्यात अडचण कसली?’ सरदार म्हणाला. ‘जरा उजवीकडे नजर टाक. इंग्लंडमधली एकमेव चमचमत्या झाडांची बाग हॅम्पशायरहवेलीमध्ये आहे.’

जिराफिने मान वळवून पाहिलं आणि तिचा तिच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. शेकडो हजारो चमचमती झाडं! आनंदाने तिच्या डोळ्यांमधून पाणी वाहू लागलं.

‘आता वाट कसली बघतेस? जा मनसोक्त ताव मार त्या फुलांवर!’ सरदार हसून म्हणाला.



जिराफी उत्साहाने उड्या मारत सुसाट वेगाने चमचमत्या झाडांकडे निघाली. फुलांनी बहरलेली झाडं पाहून ती आनंदाने नाचू लागली.

गुलाबी-जांभळ्या फुलांनी लगडलेल्या एका फांदीत तिने डोकं खुपसलं आणि ती समाधानाने रवंथ करू लागली.

'माकडू तुझ्यासाठी सुद्धा एक गंमत आहे.' सरदार माकडूकडे वळत म्हणाला. 'या हवेलीच्या चहुबाजूंना मोठमोठाले वृक्ष आहेत.'

'कसले वृक्ष?' माकडूने विचारलं.

'अर्थातच अक्रोडाचे. हे वृक्ष बारा महिने अक्रोडानी लगडलेले असतात.' सरदाराने सांगितलं.

'***अक्रोड!*** माकडू किंचाळला. 'खरंच अक्रोड? नाही नाही. तुम्ही नक्कीच माझी मस्करी करताय!'

'अरे वेड्या माकडूल्या मी खरंच सांगतोय! ते बघ अक्रोडाचं झाड. बरोबर तुझ्या मागे.' सरदार मागे हात दाखवत म्हणाला.



सरदाराचं बोलणं संपायच्या आतच माकडू अक्रोडाच्या वृक्षापाशी पोचलासुद्धा. झाडाच्या फांद्यांवर लोंबकळत तो कुरकुरीत-चुरचुरीत अक्रोड मिटक्या मारत खाऊ लागला.

'आता फक्त पेलीच राहिलाय.' सरदार म्हणाला.

'हो पण माझं अन्न असं झाडावर उगवत नाही.' पेली चुळबुळ करत म्हणाला. 'मी फक्त मासेच खातो. आणि रोज रोज मासे विकत घेणं महाग पडेल ना.'

'विकत? छे! छे! मासे काय विकत घ्यायची गोष्ट आहे का! सरदार म्हणाला. 'अरे दोस्ता, जरा डावीकडे मान वळवून बघ.'

पेलीने डावीकडे नजर टाकली. बागेच्या टोकाशी एक भलीमोठी निळीशार नदी झकास वळणं घेत वाहत होती.

'ही हॅम्प नदी आहे.' सरदाराने सांगितलं. 'जगातली सर्वात चविष्ट सुरमई ह्याच नदीत मिळते बरं का.'

'***सुरमई!***' सुरमईचं नाव ऐकून पेलीचे डोळे लकाकले. त्याने लगेच पंख पसरले आणि हवेत झेप घेतली. नदीजवळ पोचताच थंडगार झुळुकांनी तो ताजातवाना झाला. नेम धरून त्याने पाण्यात सूर मारला. थोड्याच वेळात तो बाहेर आला तेव्हा त्याच्या चोचीत एक जाडजूड सुरमई होती.



आता सरदार आणि मी दोघंच उरलो.

'किती आनंदी दिसत आहेत ना सगळे.' सरदार म्हणाला. ' बिली, आता तुझी पाळी. कंपनीच्या मॅनेजरला तर सर्वात मोठं बक्षीस द्यायला हवं. बोल, काय हवंय तुला?'

'अं....तसं काही नाही.' मला काय बोलावं तेच सुचेना.

अचानक माझ्या मनात त्या जुनाट घराचा विचार आला. तिथे पुन्हा मिठाईचं दुकान सुरु करता आलं तर! माझ्या पोटात गुदगुल्या झाल्या.

'अरे लाजतोस कशाला! काय वाट्टेल ते माग.' सरदार म्हणाला.

'ही टेकडी उतरली की जवळच एक रस्ता आहे.' मी हळूहळू सांगायला सुरुवात केली. 'रस्त्याच्या कडेला एक जुनाट घर आहे. खूप पूर्वी त्या घराच्या तळमजल्यावर एक मिठाईचं दुकान होतं म्हणे. त्या रस्त्याने मी जाऊ लागलो की मला सारखं वाटतं की खरंच कुणीतरी येईल आणि पुन्हा तिथे मिठाईचं दुकान सुरु करेल.'

'कुणीतरी कशाला? आपणच करूयात की! जगातलं सर्वात भारी मिठाईचं दुकान उघडुयात आपण!' सरदार उत्साहाने ओरडला. आनंदाने त्याच्या गुबगुबीत पांढऱ्या मिश्या इतक्या थरथरू लागल्या की एखादी खारुताईच त्याच्या चेहऱ्यावरून फिरतीये की काय असं मला वाटायला लागलं.



'आपण आताच ते घर विकत घ्यायला जाऊयात.' सरदार म्हणाला.

घर विकत घेण्यात आम्हाला मुळीच अडचण आली नाही. जिराफी, पेली आणि माकडूने एकही पैसा न घेण्याच्या अटीवर आनंदाने घर आमच्या हवाली केलं.



लगेच कामाला सुरुवात झाली. सुतार लाकडांना रंधा मारू लागले. करवतीने लाकडं कापू लागले. उंचच उंच कपाटं बनवण्यात आली. वरच्या खणांपर्यंत पोहोचण्यासाठी शिड्या आणि सामान खाली उतरवण्यासाठी टोपल्या बनवल्या गेल्या.

त्यानंतर विमानाने, जहाजाने जगभरातल्या मिठाया येऊ लागल्या. देशोदेशींच्या चित्रविचित्र मिठायांनी कपाटं तुडुंब भरून गेली.



रशियातुन हस्कीमस्काचे पुडे, जपानमधून चीशिकीनोचीकीची पाकीटं, पोर्तुगालहून प्लादोलावाचे केक आणि आफ्रिकेहून हुलुलूझुलूची सुतरफेणी आली. पाठोपाठ चीनमधून च्याऊमाऊची बर्फी आणि चांगचिंगचुचे पेढेसुद्धा आले.

सलग दोन आठवडे मिठायांचे खोके येतंच होते. मी प्रत्येक मिठाई अगदी काळजीपूर्वक चाखून बघत होतो. मी अशा किमान हजार तरी मिठाया चाखल्या असतील! पण ऑस्ट्रेलियाची चॉकलेटस सर्वात भन्नाट होती. त्या प्रत्येक चॉकलेटच्या आत एक टपोरी लालबुंद स्ट्रॉबेरी होती.



आणि इंडोनेशियाची इमलीगोळी तोंडात टाकल्यावर तर असा झटका बसतो की डोक्यावरचे सगळे केस उभे राहतात

सोबत विली वोन्कांच्या कारखान्यातल्या सुद्धा भारी भारी वस्तू होत्या.

त्यांच्या सप्तरंगी गोळ्या खाल्या की सात वेगवेगळ्या रंगांमध्ये थुंकता येतं..





जास्त बडबड करणाऱ्या मोठ्यांसाठी बनवलेले खास डिंकाचे लाडू होते.

लाडू तोंडात टाकला की त्यामध्ये दात इतके घट्ट रुतून बसतात की किमान चार तास बडबडीपासून सुटका!

दुकानाच्या उद्घाटनाच्या दिवशी मी खास ऑफर ठेवली. ***या,मनसोक्त मिठाई खा. तेही फुकटात!***



प्रचंड गर्दी जमली त्या दिवशी. दुकानात सगळीकडे लहान मुलं बागडत होती. आवडेल ती मिठाई तोंडात टाकत होती. सोबत टीव्ही रिपोर्टर आणि न्यूजपेपरवाले सुद्धा आले होते. जिराफी, पेली आणि माकडूसोबत सरदार दुकानाबाहेर उभं राहून आतली मजा बघत होता. गर्दीतून वाट काढत मी कसाबसा दुकानाबाहेर आलो. प्रत्येकासाठी मी खास भेट आणली होती.

हवेत गारवा होता. सरदाराच्या अंगात जरा उब यावी म्हणून मी त्याला खास आईसलंडहून मागवलेला वाफाळता सफरचंदाचा हलवा दिला. या हलव्याची खासियत म्हणजे तो खाल्ल्यावर अंटार्क्टिकाच्या बर्फातही उकडायला लागतं. सरदारने चमचाभर हलवा तोंडात टाकला आणि त्याच्या नाकातून काळ्या पांढऱ्या धुराचे लोट बाहेर पडू लागले.



'जबरदस्त! भन्नाट!' कपाळाला आलेला घाम पुसत सरदार ओरडला.



जिराफीच्या हातात मी एक पुडकं दिलं. त्यात फक्त मक्केला मिळणारे मधातले रसगुल्ले होते. जिराफीने एक रसगुल्ला सावकाश चावून खाल्ला आणि त्याचबरोबर मधाचा गोडवा तिच्या तीस फूट उंच मानेत पसरला.

'अहाहा... हे तर चमचमत्या झाडाच्या गुलाबी जांभळ्या फुलांपेक्षाही चविष्ट आहे!' जिराफी म्हणाली आणि तिने आणखी एक रसगुल्ला तोंडात टाकला.

पेलीला मी भरपूर वेलदोडे व खडीसाखर घातलेल्या साखरांब्याचं पाकीट दिलं. ते बघून तो आनंदाने भसाड्या आवाजात गायला लागला. पेलीने चमचाभर साखरांबा तोंडात टाकला आणि काय आश्चर्य! त्याच्या भसाड्या आवाजाचं रुपांतर एकदम सुरेल आवाजात झालं. मधुर शीळ घालत पेली नाचू लागला.



माकडूसाठी मी खास लवंगी मिरचीच्या वड्या आणल्या होत्या. लालभडक दिसणाऱ्या या वड्या फक्त चार वर्षांपुढील मुलांनाच खाता येतात बरं का. माकडूने एक वडी खाल्ली आणि त्याच्या तोंडातून आगीचा लोट बाहेर पडला.

'लई भारी माकडू! चल पुन्हा एकदा कर.' सरदार टाळ्या वाजवत ओरडला.



माकडूने एकदम चार वड्या तोंडात कोंबल्या आणि आता त्याच्या तोंडातून बाहेर पडलेला आगीचा लोट घरापेक्षाही उंच गेला.

‘आता मला जायला हवं’ मी म्हणालो. ‘दुकानात गिऱ्हाईकं माझी वाट बघत असतील.’

‘आम्ही सुद्धा निघतो. भरपूर खिडक्या साफ करायच्या आहेत आम्हाला.’ जिराफी म्हणाली.

मी सरदाराला आणि माझ्या तिन्ही दोस्तांना बाय बाय केलं. दोस्तांना सोडून जाण्याच्या कल्पनेने मला एकदम उदास वाटू लागलं. सगळेच एकदम गप्प झाले.

डोळ्यातलं पाणी कसबसं थोपवत माकडू गाऊ लागला.

***वाटतं आहे खूप उदास***

***सोडून जाताना मित्र आमचा खास***

***पण दूर कुठे जातोय आम्ही?***

***लागली आठवण यायला***

***तर लगेच येऊ भेटायला***

***जिराफ आणि पेली आणि मी!***

